सांगली जिल्ह्यातील वाळवा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्त्याची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.४७ /नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १७ मार्च २०२०.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र. मुअ(पुणे)/का-२/रेशा /९२ /३९३१/२०१९, दि.२९/०८/२०१९.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सांगली जिल्ह्यातील वाळवा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्त्याची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, सांगली यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, सांगली यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, सांगली यांचा ठराव विचारात घेऊन सांगली जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | रा.म.मा.क्र.४ ते नेर्ले कापूसखेड इस्लामपूर बहे नाका हनुमाननगर ते जल शुध्दीकरण केंद्र बहे पुल रस्ता. | इजिमा क्र.-२८ | ०/०० ते ८/८०० (८.८० कि.मी.) | १८.३० कि.मी | प्र.जि.मा.-१४२ |
| | | इजिमा क्र.-४७ | ०/०० ते ९/५०० (९.५० कि.मी.) | | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील सांगली जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत १८.३० कि.मी. ने वाढ होवून एकूण लांबी (३२५३.४३० +१८.३०) म्हणजेच ३२७१.७३ कि.मी. इतकी व इतर जिल्हा मार्ग रस्त्याच्या लांबीत १८.३० कि.मी. ने घट होवून एकूण लांबी (१८८७.९६ -१८.३०) म्हणजेच १८६९.६६ कि.मी. इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१७१२२१०६४४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.03.17 12:26:12 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव(नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, सांगली.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सांगली (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सांगली.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.